शालेय शिक्षण व क्रीडा विभागाच्या अधिपत्याखालील न्यायालयीन प्रकरणे हाताळण्याबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : न्यायप्र-२०१७/(१६५/१७)/एसडी-६**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक : २३ ऑगस्ट, २०१७**

**परिपत्रक :**

महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे दाखल करण्यात आलेल्या मुळ अर्ज क्र. ५७०/२०१७ प्रकरणी मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई यांनी दिनांक २६ जुलै, २०१७ रोजी दिलेल्या आदेशान्वये विभागाकडून विहित कालावधीत शपथपत्र दाखल न केल्यामुळे तीव्र नाराजी व्यक्त केली आहे. या पार्श्वभूमीवर पुढीलप्रमाणे सुधारित सूचना देण्यात येत आहेत :-

१. उच्च न्यायालयाच्या खंडपीठांसमोर अथवा महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाच्या खंडपीठांसमोर दाखल होणारी न्यायालयीन प्रकरणे विभागात प्राप्त झाल्यावर त्याच दिवशी संबंधित सहसचिव, उपसचिव यांच्यामार्फत प्रधान सचिवांना अवगत करण्यात यावे.
२. संबंधित सहसचिव / उपसचिव यांनी न्यायालयीन प्रकरणांची वस्तुस्थिती विचारात घेवून शपथपत्र दाखल करावे किंवा क्षेत्रिय स्तरावरील अधिकाऱ्यांना शपथपत्र दाखल करण्यास प्राधिकृत करावे.
३. शासनाच्या वतीने शपथपत्र दाखल करण्यासाठी प्राधिकृत करण्यात आलेल्या प्राधिकरणाने कोणत्याही परिस्थितीत संबंधित प्रकरणी शपथपत्र दाखल करण्यासाठी अन्य प्राधिकरणास प्राधिकृत करण्यात येऊ नये.
४. उच्च न्यायालयाच्या खंडपीठांसमोर अथवा महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाच्या खंडपीठांसमोर दाखल होणाऱ्या न्यायालयीन प्रकरणात बरीचशी प्रकरणे ही धोरणात्मक निर्णयातील तरतूदींच्या अंमलबजावणी संदर्भात दाखल होतात. अशा प्रकरणी धोरणात्मक निर्णयास आव्हान देण्यात आले असल्यास अशी प्रकरणे शासन स्तरावर सादर करण्यात यावे.
५. प्रस्थापित धोरणाच्या अंमलबजावणीच्या संदर्भात वेगवेगळ्या खंडपीठांसमोर न्यायालयीन प्रकरणे दाखल झाली असल्यास अशा प्रकरणी शासनाच्या भूमिकेमध्ये एकवाक्यता असणे आवश्यक आहे. तसेच अशा प्रकरणांमध्ये एखाद्या खंडपीठासमोर निर्णय झाला असल्यास सदर निर्णयाचा किंवा सदर निर्णयात उपस्थित करण्यात आलेल्या मुद्यांचाही विचार दुसऱ्या खंडपीठात दाखल झालेल्या न्यायालयीन प्रकरणी विचारात घेणे आवश्यक आहे. यास्तव अशा प्रकरणी आयुक्त (शिक्षण) / संचालक स्तरावरुन परिच्छेदनिहाय अभिप्रायास मान्यता देऊन संबंधित अधिकाऱ्यांना शपथपत्र दाखल करण्यासाठी प्राधिकृत करण्यात यावे.
६. संबंधित न्यायालयीन प्रकरणी शपथपत्र दाखल झाल्यानंतर सुनावणी दरम्यान पाठपुरावा करणे व वेळोवेळी उपस्थित होणाऱ्या मुद्यांच्या अनुषंगाने शासकीय अभियोक्ता / सादरकर्ता

अधिकारी यांना माहिती उपलब्ध करुन देण्यासाठी आवश्यकतेनुसार शासन अथवा संचालनालयाकडे दूरध्वनी / ई-मेल यासारख्या माध्यमाद्वारे तात्काळ संपर्क साधून वेळीच पूर्तता करण्याची जबाबदारी संबंधित संचालकांची राहील.

७. मा. उच्च न्यायालये/ प्रशासकीय न्यायाधिकरणे यांनी दिलेल्या निर्णयांमध्ये अनेकवेळा अंमलबजावणीसाठी कमी वेळ दिलेला असतो. तसेच काही प्रकरणी असेही निदर्शनास आले आहे की, न्यायनिर्णयाविरुध्द अपिल / पुनर्विलोकन याचिका दाखल करण्यासाठी न्यायनिर्णयात विहीत केलेल्या कालावधी उलटून गेल्यानंतर किंवा सदर कालावधी संपण्याच्या आसपास संचालनालयाकडून शासनास प्रस्ताव प्राप्त होत असतात. अशा प्रकरणी निर्णय घेण्यास पुरेसा अवधी हातात रहात नसल्याने नाईलाजास्तव न्यायनिर्णयांची अंमलबजावणी करावी लागण्याची स्थिती निर्माण होते. यास्तव अशा प्रकरणी मा. उच्च न्यायालये / प्रशासकीय न्यायाधिकरणे यांच्याकडून देण्यात येणाऱ्या निर्णयांच्या प्रती मा. उच्च न्यायालये / प्रशासकीय न्यायाधिकरणे यांच्या प्रबंधक कार्यालयांकडून प्राप्त होण्याची प्रतिक्षा न करता सदर न्यायनिर्णयांच्या प्रती लवकर प्राप्त करुन घेण्याची जबाबदारी संबंधित संचालकांची राहील.

८. मा. उच्च न्यायालय / मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण यांच्या खंडपीठांनी दिलेल्या न्यायनिर्णयाच्या संदर्भात संबंधित न्यायालयाने विहित केलेल्या कालमर्यादेत सदर निर्णयाची अंमलबजावणी होणे किंवा त्याविरुध्द पुनर्विलोकन याचिका / अपील याचिका दाखल होणे आवश्यक आहे. यास्तव ज्याप्रकरणी अंमलबजावणी करावयाची आहे अशा प्रकरणी अंमलबजावणीच्या कारणमीमांसेसह व सदर अंमलबजावणीमुळे होणाऱ्या संभाव्य आर्थिक व प्रशासकीय परिणामांच्या तपशीलासह आवश्यकतेनुसार प्रस्ताव शासनास सादर करण्याची जबाबदारी संबंधित संचालकांची राहील.

९. ज्या न्यायालयीन निर्णयांविरुध्द पुनर्विलोकन याचिका / अपील याचिका दाखल होणे आवश्यक आहे, अशा प्रकरणी संबंधित सरकारी अभियोक्ता /सादरकर्ता अधिकारी यांचे अभिप्राय तसेच पुनर्विलोकन याचिका / अपील याचिका दाखल करण्यासाठी न्याय निर्णयात उपस्थित करण्यात आलेल्या मुद्यांशिवाय इतर नवीन मुद्दे तसेच न्याय निर्णय उल्लेख करण्यात आलेल्या मुद्यांच्या उहापोहासह स्वयंस्पष्ट अभिप्राय व मुळ अर्ज / याचिकेची प्रत व त्याअनुषंगाने शासनाच्या वतीने दाखल करण्यात आलेल्या शपथपत्राच्या प्रतीसही परिपूर्ण प्रस्ताव शासनास सादर करण्याची जबाबदारी संबंधित संचालकांची राहील.

१०. वरील ५ व ६ मध्ये उल्लेख करण्यात आलेले प्रस्ताव संबंधितांकडे पाठवितांना प्रस्तुत प्रकरणी निर्णय घेण्यास सक्षम असलेल्या प्राधिकरणास मा. उच्च न्यायालय / महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण यांनी विहित केलेल्या कालमर्यादेत निर्णय घेण्यास पुरेसा कालावधी उपलब्ध राहील याची दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित संचालकांची राहील.

११. कालमर्यादेअभावी अथवा योग्य पाठपुराव्याअभावी विहित कालमर्यादेत न्यायालयीन आदेशांच्या अनुषंगाने अंमलबजावणी अथवा पुनर्विलोकन याचिका / अपील याचिका दाखल

करण्यासंदर्भात कार्यवाही न झाल्याने अवमान याचिका दाखल झाल्यास संबंधितांविरुध्द जबाबदारी निश्चित करुन त्यांच्याविरुध्द विभागीय चौकशीचा प्रस्ताव सादर करण्याची जबाबदारी संचालकांची राहील. तसेच अशा प्रकरणी शासनावर अनावश्यक आर्थिक भार पडत असल्यास / पडणार असल्यास सदरची वसूली संबंधितांकडून करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०८२३१६१८३८५५२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Nand Kumar

Digitally signed by Nand Kumar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c98b875883e76c14d91ed7b89546e6c11e439cad32d7f5cff487862cc567ee39, serialNumber=dcd3577ebf0e05e2a8b57095c152dc6cfb37c2bb83da197788645dd8a362ebc5, cn=Nand Kumar
Date: 2017.08.23 16:09:10 +05'30'

**(नंदकुमार)**
**प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
३. मा. मंत्री, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे खाजगी सचिव
४. मा. मुख्य सचिव यांचे उपसचिव
५. मा. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
६. मा. सरकारी वकील, उच्च न्यायालय, मुंबई (मुळ शाखा/अपिल शाखा) खंडपीठ औरंगाबाद, खंडपीठ नागपूर
७. मा. मुख्य सादरकर्ता अधिकारी, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधीकरण, मुंबई, औरंगाबाद, नागपूर
८. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
९. राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई
१०. राज्य प्रकल्प संचालक, राष्ट्रीय माध्यमिक शिक्षा अभियान, मुंबई
११. अध्यक्ष / सचिव, माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१२. शिक्षण संचालक (प्राथमिक/माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे.
१३. संचालक, विद्याप्राधिकरण, पुणे.
१४. संचालक, बालभारती, पुणे.
१५. सर्व विभागीय अध्यक्ष, माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ.

१६. सर्व विभागीय सचिव, माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ.
१७. सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक.
१८. सर्व प्राचार्य, जिल्हा शैक्षणिक सातत्यपूर्ण व्यावसायिक विकास संस्था
१९. सर्व शिक्षणाधिकारी (प्राथमिक / माध्यमिक), जिल्हा परिषद
२०. शिक्षण निरिक्षक, मुंबई (पश्चिम, दक्षिण, उत्तर)
२१. सर्व प्रशासन अधिकारी, महानगरपालिका
२२. सर्व मुख्य अधिकारी, नगरपालिका
२३. सर्व गटशिक्षणाधिकारी
२४. निवड नस्ती, एसडी-६